मनोहर ग्रंथमाला प्रकाशन ९ वें.

# राका



कवयित्री

सौ. संजीवनी मराठे.
बी. ए.

किं. १/रु.



प्रकाशक:-
मनोहर महादेव केळकर
६१५।२३ सदाशिव, पुणें.

चित्रकार:-वसंत महादेव केळकर.
आर्ट कॉर्नर, बेंक हाऊस लेन.
फोर्ट, मुंबई.

मुद्रक:-
लक्ष्मण सखाराम केळकर,
जनार्दन सदाशिव लि.चा प्रेस,
३९४. सदाशिव पुणें, २.

# निवेदन



काव्य प्रसिद्ध केल्यास त्यावर मिळणाऱ्या बऱ्यावाईट अभिप्रायांमुळें भावि काव्य अधिक सरस होईल या आशेनें माझे वडील ती. रा. रा. ग. स. मराठे अक्च्युअरी यांनीं १९३२ मध्यें माझा एक छोटेखानी काव्य-संग्रह प्रसिद्ध केला होता. त्यांच्या आशेला आलेलें हें चिमुकलें फूल त्यांच्या नजरेसमोर आणण्यांत मला धन्यता वाटत आहे. या कामीं पुस्तकाचे हौशी प्रकाशक रा. केळकर व ज. स. लिमिटेड् प्रेसचे चालक यांची मला जी अमोल मदत झाली आहे तीबद्दल मी त्यांची फार ऋणी आहें.

या संग्रहांतील कांहीं गीतें रा. विनायक नारायण पटवर्धन यांचे 'बाल-संगीतांत' प्रसिद्ध झालेलीं आहेत. तसेंच मागील काव्य-संग्रहांतील कांहीं कविताहि यांत पुनर्मुद्रित केल्या आहेत.

'राका' चा रसिकांकडून सानंद स्वीकार होईल अशी आशा आहे.

संजीवनी.



# राका

## अनुक्रमणिका

# गीत-विभाग

## स्वागत

( चाल–ठेविलें पाऊल दारीं )

जन्मजन्मीं गुंतलेले पाश बाळा आपुले
आज म्हणुनी गेह माझें मंगलानें नाहलें
भेवडावी अंधकारी रात्र ही, दाटे भय
दैव म्हणुनी चंद्रज्योती पाजळी तेजोमय
कल्पनेनें रंगवीलें विश्व जें रात्रंदिन
मूर्तरूपें तेंच माझें रंजवी कां लोचन ?
ये गृहाला बाळराणा जीवनाचा माझिया
स्वागताची सिद्धता ना काय अर्पूं मी तया ?
हृदय माझें अंथरोनी घालुं कां शय्या मऊ ?
दाटलें वात्सल्य पोटीं पाजुनी कां शांतवूं ?
घडवियेलें बाळलेणें- भाव माझे गुंफुनी
घालुं कां ? घेशील ना तें प्रेमभावें मानुनी ?

---

# – एक करुण कथा –



( एका गोजिरवाण्या सशाला भूल देऊन जखडलें आणि
त्याला कापून आम्ही प्राणि–शास्त्र शिकलों ! ! )

( साकी )

थांबवितां कां उगाच अपुल्या गुजगोष्टी ? या बोला,
शांत मनानें शांततेंत हा कधींच झोपीं गेला
ज्यांच्या साह्यें विहरतसे हा स्वातंत्र्याच्या स्वर्गीं
हस्तपाद ते आज जखडिले इथें जागच्याजागीं
खुशाल बांधा ! घोर माजुं दे शक्तियुक्तिचा वाद
तो तर गेला कधींच तोडुनि या जगताचे बंध !
ज्या झुलीस्तव तुच्छ लेखिलें वैभव स्वर्गांतील
तीच कापितां शस्त्र दुधारी सरसर हातांतील
अजुनि कशी ही झोंप उडेना ?—झोंप कशाची आली,
प्रभुच्या भांडारावरि त्याची नजर अतां खिळलेली !
खुट्ट वाजतां टवकारुनी चाहुल घेती कान
खुशाल वाजो डंका तुमचा, कुठलें त्यांना मान !

मार्ग तेथला नवखा, नवखें भोंवतालचें रान
मार्ग धन्याचा शोधुनि देती तोच तयां बहुमान !
बिनमोलाचीं दोन माणकें नेत्र तयाचे लोल
आज पांढरे थिजले पाहुनि हृदयिं उठे कल्लोल
वत्सल अपुला भाव दावुनी सख्या एकदां पाहीं,
—वेडी आशा उगाच, तो तर रमला दुसऱ्या ठायीं !
दांतखिळ चिमणी बसलेली, मुख चिमणें उघडेना
कुबेर आतां धनी तयाचा, कुठुनी त्याची दैना !
तृणांकुरांनीं खुशाल खेळा जाउनिया भंवतालीं
या जगतांतुनि भूक तयाची कधींच उडुनी गेली !
सख्या पाडसा ! हरहर; जहरी शस्त्र उराशीं भिडलें,
सरसर गेलीं हृदयसंपुटें——हृदयहि आतां गेलें !
या हृदयाशीं रात्रंदिन निज हितगुज त्यानें केलें,
खुशाल जावो, गुपित तयाचें परि न कुणा कळलेलें !
डोळे उघडुनि पहा एकदां, निरोप दे आम्हांतें
नको पाडसा नको जोडणें तुझें आमुचें नातें !

मायाममता कसली ? बनला फत्तर स्वार्थोपायीं
क्षमा तरी कोणत्या मुखानें मागूं ? शब्द न येई
विसकटला संसार तुझा रे तुटले मायापाश
दिला कुणी अधिकार अम्हां हा करण्यासी विध्वंस ?
असेंच आमुचें जीवन, आमुचा ज्ञानाचा सोपान
एक पायरी चढतों येतां परी खालतीं दोन
जळो ज्ञान तें—स्मरण तयाचें—गहिंवर चित्ता येतो
अगणित आमुचीं पापें त्यांची गणती करिल प्रभू तो

× × ×

शास्त्रज्ञांनों चला सांवरा शस्त्रास्त्रें—कर उचला,
वृथा कचरतां कशास ? -- हा तर ब्रम्हानंदीं रमला :

———

# जीवित

—०—

( चाल-आनंदी आनंद गडे )

जनन असे ज्या, मरण तया, सखये जाणुनि या न्याया ॥
सोडी मानसिचें झुरणें, पुरे अश्रु हें ओघळणें ॥
काळसागरींची देख, जीवित—उर्मी ही एक ॥
कितीक येती, अंतीं जाती,
लाभ न कांधं, नच शोक करी, हृदयकसोटी हीच पुरी ॥१॥

फुलती सुमनें उद्यानीं, स्वतः हंसोनी, हंसवोनी ॥
दो दिवसांनीं सुकुनी हीं, गळती अवनीवरि पाहीं ॥
काळाच्या उद्यानींचीं जीवित—सुमनें हीं साचीं ॥
कितीक फुलती, अंतीं सुकती,
लाभ न कांधं, नच शोक करी, हृदय-कसोटी हीच पुरी ॥२॥

भुलवित जगता मधु गानें सरिता वाहे वेगानें ॥
थोरासंगें सान जसे, धांवति बुद्‌बुद हे तैसे ॥
काळाच्या सरितेवरचे जीवित बुद्‌बुद हे साचे ॥
कितीक उठती, अंतीं फुटती

लाभ न कधिं, नच शोक करी, हृदय-कसोटी हीच पुरी ॥३॥

नभांगणीं बघ या वरती रम्य तारका लुकलुकती ॥
येती प्रत्यहिं गगनांत, विलीन होती तेजांत ॥
काळाच्या गगनावरती, जीवित-तारा चमचमती ॥
किती क दिसती, अंतीं लपती,
विश्व चाललें या न्यायें, रंगूं प्रभुनामीं सख्ये ॥४॥

---

## संवेदना

( ओवी )

पूर्वेचिया मंदिरांत उजळला प्रेमभाव
सांग कैसा शांत करूं माझ्या मानसींचा दाह ?

क्षणाक्षणांच्या आंदोलीं विखुरते पुष्पमाल
सांग कैसा सांवरूं मी माझ्या मानसाचा तोल ?

पवनाच्या निःश्वासानें गोड गंध दरवळे
सांग ताई ठेवूं कोठें माझ्या मानसींचीं फुलें ?

पुष्पापुष्पांच्या भोंवतीं    गोड भृंगांचें गुंजन
झोपवूं मी कोठें ताई    सांग माझें वेडें मन ?

बिजलीच्या नर्तनांत    उजळतें सारें विश्व
सांग ताई झाकूं कैसे    माझ्या अंतरींचे भाव ?

चांदण्याच्या उन्मादांत    जळ नाचे खालींवरी
कैसी ताई गऽ आवरूं    वेड्या मनाची भरारी ?

सांग सांग माझे ताई    कैसें करूं बोलूं काय ?
कैसें शांतवूं हें मन ? —जिवा लागलीसे हाय ! !

---

## विहगास

( प्रणयप्रभा )

कां क्षुधार्त होउनि तडफडसी
मी मार्ग सांगतों चल तुजसी

आप्त-इष्ट प्रिय-बंधु सुहृद ते
काल सकाळीं जमले होते

कांता पोरें गेली कोठें
विपत्तींत सोडुनि तुजसी ?

हृदयाचा खंबीर एकला
पुरे गड्या रे दस लाखाला
प्रसंगींच परि तो डगमगला
तो क्षुद्र मनाचा मज गमसी !

शेत चहुंकडे देख पसरलें
कणिसांचे भरघोंस लोंबले
वृक्ष थोर फलभारें लवले
तूं स्वस्थ कसा रे तरि बससी ?

बुजग-बाहुलें क्षुद्र येथलें
जे भेकड ते त्याला भ्याले
हस्तपाद कां तवहि गळाले ?
घे ऊठ भरारी उंच अशी !

---

# अनन्य-भाव



( रूपांतरित )

सांग कधीं मम दारावरुनी जाशिल तूं मंदिरा,
सांग कधीं राजसा जिवाचा सण होइल साजरा.

वसंतसमयीं पुष्पें फुलती पुष्पवाटिकेंतुनी
वेचुनि तीं पसरितें हळुंहळू तुझिया मार्गांतुनीं
तुडवुनि जाशिल ? खुशाल जाईं विशाद ना मन्मना
तूं गेल्यावर त्या पुष्पांवर उरेल कां वासना ?

गुंगुनि टाकी तव हृदयातें ज्यांची स्वरमाधुरी
तीं गीतें छेडितें धरुनियां करिं मंजुळ बांसरी
श्रवण न करितां जाशिल कां तूं ? खुशाल जा मोहना
तूं गेल्यावर त्या गीतांवर उरेल कां वासना ?

ज्या हृदयावरि गुंफिलेस तूं कवनहार सुंदर
त्या हृदयाचा उभी घेउनी नजराणा मृदुतर
लाथाडुनि त्या जाशिल कां तूं ? बोल चित्तरंजना
तूं गेल्यावर त्या हृदयावर उरेल कां वासना ?



यक्षा

तुझ्या जिवावर आज झुलतसे ही जीवित-संपदा
तूं गेल्यावर विरुनी जाइल क्षणांत प्रभुच्या पदां!

---

## माझें वैभव

( जाति प्रणयप्रभा )

मज भिकारीण कां गे वदतां ?
सद्भावांचें वसन रेशमी
सुविचारांचें भोजन नामी
करुनि पहुडलें मी आरामी
कां रोखुनि सर्वजणी बघतां ?
वर्षु देत गगनीं जलधारा
रवितेजानें पोळुं दे धरा
क्षिति न तयाची मज लवहि जरा
दृढ निश्चय छत्र असे हातां।
विश्व–प्रीतिची मंगल माला
ऐश्वर्यें लाजवितें श्रीला

सत्याची दीपिका उज्ज्वला
घनतिमिरीं उजळविते जगता !

म्हणूं नका मज अनाथ कोणी
विश्व-सदन माझेंचि, त्यांतुनी—
नांदतात मम बंधू भगिनी

तो विश्व-पाल माझाचि पिता
मज भिकारीण कां गे वदतां ?

---

## मुग्धा

( मालिनी )

सुरुचिर लतिकेची एकली बाळ होती,
निज विविध गुणांनीं शोभवी पुष्पपंक्ती.
बहर फुलत होता रम्य त्या यौवनाचा,
प्रिय विषय जहाली काननींच्या जनांचा. १

अरुण तिज सकाळीं वस्त्र सौवर्ण देई,
उघडुनि निज नेत्रां हांसुनी त्यास घेई.
हंसत डुलत येतां सागरींचा समीर,
हलुहलु झुकवोनी मान पाही समोर. २

तिजसि गगनराजा मौक्तिकें नित्य देतां,
निज तनुवरि घाली तोषवी राजचित्ता
विपिनिं कधिं झऱ्याचें गान रंगांत येई,
घडि घडि झुलवोनी मान ठेक्यासि देई. ३

परि अलि प्रणयाचें गीत गाण्यास येई,
निज तनु कलिका ती झांकुनी सर्व घेई.
मग हळुंच वदे त्या आडुनी पल्लवांच्या,
'प्रियकर चरणीं ही अर्पिली दीन काया. ४

अजुनि दिवस कांहीं वाट पाहीं सख्या रे,
मग मधु हृदयींचा—गंध—तझेंचि सारें !'
उठुनि मधुप जाई; आस—तृप्ती जहाली,
प्रमुदित मग चित्तें बाळ ती झोपिं गेली. ५

प्रणय न परि जाणी विश्व तीचा अलीचा,
खुडुनि तिजसी नेती नेम हाची जगाचा,
मग 'प्रभुसि' जरी ती अर्पिली मुग्ध बाला,
तरिहि सकुनि गेली !—कोण पाही तियेला ! ! ६

---

## —जेव्हां—

—0—

( जातिः-भूपातिवैभव )

हें हृदय भरोनी जाइल आनंदानें
तेव्हांच गडे मी गाइन तुजला गाणें

ग्रीष्मांत वल्लरी जाती पोळुनी
त्या वसंत-समयीं येतां बहरुनी
मृदुमृदुल कोवळीं पानें लेवुनी
दशदिशीं उधळतिल प्रफुल्ल अपुलीं सुमनें
तेव्हांच गडे मी गाइन तुजला गाणें

वितळुनी रात्र काळोखी जाइल ऽ
जागृती स्वप्नसंसारा येइल ऽ
ही उषा मुग्ध हांसोनी पाहिल ऽ
करितील विहंगम स्वागत मंजुळवाणें
तेव्हांच गडे मी गाइन तुजला गाणें

झुरतसे जिच्यास्तव सिंधू भूवरी
ती झुरे चंद्रिकाबाला अंबरीं
लाभोनि तिला प्रीतीची माधुरी

येईल पौर्णिमा उधळित जग तेजानें
तेंव्हांच गडे मी गाइन तुजला गाणें

---

## बाळ करीं झोपला



अंगाइगीत परिसुनी सखे हा बाळ करीं झोपला

हा वसंत ऋतु येउनी
जातसे लता फुलवुनी
परि येउं कशी उपवनीं सखे हा बाळ— — —

फुललीं हीं जळिं सुंदर
नव कमळें चेतोहर—
परि येउं कशी तिथवर सखे हा बाळ—

क्षणि क्षणीं मनोहर सखे
कोकिळा गीत गातसे
होइल यावया कसें सखे हा बाळ—

या नटुनि थटुनि अंगना
जाताति गौरिदर्शना
परि मुळिं न रुचे हें मना सखे हा बाळ—

रागवूं नको प्रियसखे
सुखमय जरि शोभा दिसे
हरपुनी भान जातसे देखतां बाळ करीं—

मज नको आपिलीं कुणी
नव सौख्यें पदिं आणुनी
मज एक हवें निशिदिनीं असावा बाळ करीं झोंपला.

---

## याचना



नको असा राग धरूं
गर्द मेघांचे अंतरीं
वीज रम्य खेळ करी !

नको असे बोल बोलूं
सप्तसागरांचे अंतीं
सांठवीले मणी मोतीं !

नको अशी दूर लोटूं
रवीच्या गऽ करबळें
बिंदु दंवाचे आटले !

नको अशी खालीं पाहूं
पहा परागांचे आंत
मधु बैसला खेळत ! !

नको नको अशी जाऊं
ज्योत कांपे वाऱ्यासंगें
खोल मानसाचे धागे !

जन्मजन्मांची लागली
जीवनासी एक आस
क्षण माझ्यासंगें हांस

---

# भावभंग



सतत येऊनियां        उजळसी त्या स्मृती
कष्टवीसी जिवा        व्यर्थ राया किती

लहरि लहरी जलीं
क्षणिं क्षणीं नाचतां
सांग येईल कां        बिंब तें पाहतां ?

पाकळी पाकळी
विखुरतां भूवरी
कुठुनि माला तरी        गुंफणें गोजिरी ?

तरळतां अंबरीं
स्वैर घनमालिका
सलिल—धारा पुन्हां सांग वर्षेल कां ?

भंगतां अंतरीं
भावमूर्ती पुरी
कोठुनी लाभणे        प्रीतिची माधुरी ?

---

# संगमोत्सुक



( ओवी )

तुझ्या मीलनाची आशा नादावते रोमरोमीं
वनराईतुनी जैसें गीत घुमतें पंचमीं

तुझ्या मीलनाची आशा तरळते माझ्या मनीं
वसंतींचा परिमल जैसा भ्रमे वनोवनीं

तुझ्या मीलनाची आशा तरळते मानसांत
जैशी बिजलीची रेषा घनदाट अंबरांत

तुझ्या मीलनाची आशा उसळते क्षणोक्षणीं
जैशी सागराची लाट पूर्ण चंद्रातें पाहुनी

तुझ्या मीलनाची आशा माझ्या जिवाचें जीव
पंचारती करावया आतूरले हे लोचन

---

# निद्रेप्रत

( ओव्या )

काळोखींच्या तुफानांत । दर्या खवळोनी गेला
पैलतीरा पोचविला । जीव कोणी ?

पर्जन्याच्या सोसाट्यांत । भूमि कांपे झंजावातें
निज पदरीं झांकीतें । जीव कोण ?

रातकिड्यांच्या संगतीं । रात्र घोर खेळ खेळे
चंद्रबिंब दावीयेलें । जीवा कोणी ?

वसंताच्या खेळापायीं । जीव गेला कोमेजून
कौमुदीची पाखरण । कोण करी ?

निष्ठूर या विश्वपायीं । देह वाहवोनी गेला
तरी प्रेमें आलिंगिला । जीव कोणी ?

सखे साऱ्या गऽ विश्वांत । तूंच आधार जिवाला
चल टाक माझ्या गळां । कर तूझे !

---

## रानकिशोरीस

( प्रणयप्रभा )

बन रम्य गमे परि घोर मुली
पद जपुनि टाक तूं भंवताली

कोकिल रमला सुमधुर गानीं
जासि धराया भान विसरुनी
क्षणांत परि तो जाइल उडुनी
शर तुलाच भेदिल उरस्थलीं०

मृदु पर्णांच्या गालिचावरी
जाउनि बससी परि तीं सारीं
सुकुनि विखुरतिल वायुलहरिंवरि
क्रिंति कंटक रुततिल चरणतलीं०

हंसत येतसे गगनिं दिनमणी
जाउं नको गऽ परी अंगणीं
लुटितिल तुजला भ्रमर धांवुनी
कीं नलिनि विकसली नव सलिलीं०

मधुर मधुर नव गंध दरवळे
स्वर्ण-केतकी निकटिं तव झुले
हंसत झुलत तूं जाशिल बाले
परि जहर विषा पडशील बळी०

हृदयिं सुमंगल भाव विकसला
वन-पुष्पांची अर्पुनि माला

स्थापिलेसि हृन्मंदिरिं ज्याला
तो देव नसुनि पाषाण मुली
पद जपुनि टाक तूं भंवतालीं०

---

## तुझा यत्न

चालः–मन शुद्ध तुझं. ( कुंकू )

कां वदसि गड्या आजच ही दौड फुकाची
देईल तुझा यत्न तुला जोड यशाची
हौस जिण्याची

कुणि कटके मायेचे पाश विणोनी
खेंचिति जरि तुज मागें–त्यां न गणोनी

होइं पुढें स्मरूनि गोड पैज मनींची
देईल तुझा यत्न तुला जोड यशाची

भंवतालीं श्वापदमय निबिड वनें हीं
गिरिकुहरीं बिकट जरी चढण दिसे ही

ऐक जरा परि मधुरा वाणि झऱ्याची
देईल तुझा यत्न तुला जोड यशाची

शिशिरामागून चढे बहर वसंता
तिमिराला अनुसरते किरण—शलाका

ऊठ तरी वृत्ति धरीं मनिं तडफेची
देईल तुझा यत्न तुला जोड यशाची
हौस जिण्याची !

---

## मावळला दिन
( अनुवाद )

राग—दरबारी कानडा

मावळला दिन, पसरली निशा
तिळभर नुरला धीर मानसा

नगरांमधिं तूं जातां परतुनि
जाशिल माझ्या दारावरूनी
हृदयीं भरली ही सुख—आशा !

दूरवरी बघतें न्याहाळुनि
चाहुल घेतें बघ फिरफिरूनी
अवरोधुनि कुठवरि निःश्वासा !

हतदैवा मी ! मावळला दिन,
वेडावित ये रजनी निर्घृण
गुंफित अपुल्या मायापाशा !

विकल जाहलीं गात्रें सारीं
लोचनांपुढें ये अंधेरी
हा दैवा ! सजलास विनाशा ! !

निद्राधिन मी; हळु तूं येशिल,
क्षण थबकोनी तसा परतशिल
उधळुनियां जीवनीं निराशा !
मावळला दिन, पसरली निशा ! !

---

## बाळांची नगरी



( George Cooper च्या कवितेवरून )

चाल " **बाळ गुणी** " प्रमाणें कांहींशी.

" दूर किती—इथुनी नगरी बाळांची ? "
" उंच वितानीं
पहा जाउनी

कथेल कुणिही
पुण्यमयी—कोठें बाळांची नगरी."

" काय गडे—सुंदर त्या नगरीमध्यें ? "

" बालमंडळी
दिसति विनटली
धवलित वसनीं
मधु—वदनें—रसरसलेलीं तेजानें ! "

" काय गडे—करिती बाळें तीं तिकडे ? "

" स्वर्मिं गुंगतीं
हंसतिं नाचतीं
मधु बाळें तीं
आनंदें—जीव रमवितीं स्वच्छंदें ! "

" काय गडे—बाळें तीं वदती तिकडे ? "

" गमती जमती
कुणी बोलती,
कितीक गाती
मधुवाणी—पक्ष्यांचीं मंजुळ गाणीं ! "

" कोण कशी—अधिराणी त्या नगरीची ? "

" जिची सदयता
येइ न तुळितां,
मातृ—देवता
प्रेममयी—तीच मार्ग बाळां दावी ! "

" कधीं गडे—जाइन त्या नगरीमध्यें ? "

" स्वार्थपसारे
विरतिल सारे
क्षणीं त्याच रे
तुझ्या घरीं—येइल बाळांची नगरी ! "

---

## सांग मनमोहना

राग–पटदीप

सांग लाभेल कां शांति मम जीवना ?
निबिड तिमिरांतुनी
धीर द्याया मनीं
सांग देतील कां तारका दर्शना ?

प्रखर किरणांतुनी
जीव पोळे वनीं
सांग करितील कां जलद जलसिंचना ?

विहरण्या अंबरीं
स्वैर वाऱ्यावरी
सांग जातील कां दीन मनकामना ?

जन्म जन्मांतरीं
करपल्या अंतरीं
सांग फुलतील कां त्या मृदुल भावना ?

गूज रात्रंदिनीं
सांठवीलें मनीं
श्रवण करिशील कां ? सांग मनमोहना !

सांग लाभेल कां शांति मम जीवना ?

---

## मोहपाश

( भाषांतर )

गृहा नेला मृत—वीर तिचा नाथ
दीन बाला राहिली परी शांत

स्त्रिया वदती जमुनियां गृहांतील
' मृत्यु येइल जरि क्षण न ही रडल ! '

कुणी स्तविती त्या मृदुल गोड वाचें
' तिच्या प्रीतीला योग्य हृदय त्याचें !

जगीं मित्रोत्तम, शत्रुसी उदार ! '
तरी नाहीं लोटला अश्रुपूर.—

तिच्या शेजारीं कुणी बैसलेली
हळुंच त्याच्या मृत–तनू समिप गेली

वस्त्र काढोनी घेतलें मुखींचें
तरी नाहीं दखिले अश्रु तीचे !

तोंच उठली तेथून वृद्ध दाई
बाळ चिमणा आणुनी अंकिं देई !

क्षणीं स्फुंदोनी वदे ' आज राजा
तुझ्यासाठीं परतला जीव माझा ! '

# आधार



चाल--तूं बोलल्याविना मी.

आधार या जिवाचा
तूं एकला जगीं या ।
निशि नाच तारकांचा
भुलवी न अंतराला
अभिषेक कौमुदीचा
नच दे जिवा विसांवा ।
फुलला वसंत मार्गीं
नच भावना मनींच्या
करस्पर्शनें तुझ्या ही
कलिका झुरे फुलाया ।
अंधार भोंवतींचा
भिववीत जीवनाला
झणिं दाव लोचनींचा
प्रेम—प्रकाश राया ।

क्षणमात्र वा सदाची
क्षिति ना मना तियेची
परि भेट एकदां दे
चिरकाल हांसवाया
आधार या जिवाचा
तूं एकला जगीं या ।

---

## शिशुपाठ

जाति-मुद्रिका

" जायचें घेउनी बाहेरी छबुकला
पाळण्यामधें खेळोनी तो असेल कंटाळला
मंडपीं बहरली जुई तया रमविण्यां
देखून तयाच्या चित्तीं उमलतील सद्भावना
ती तिकडे गाई आम्रावरि कोकिला
होईल ऐकुनी त्याचा सुमधुर मोकळा गळा
पलिकडे पहा तो बागडतो निर्झर
धांवेल तसा मम तान्हा दुडदुड उभ्या घरभर

पुनवेचा शशिही असेल पूर्वांगणीं
तेजाळ स्निग्ध छकुला हा होईल तया देखुनी

किति किती वाटतें झटुनि, कष्ट साहुनी
ध्रुव प्रल्हादासम माझा लडिवाळ करावा गुणी

किति खुळी तरी मी, दिवस पहा मावळे,
लाविते तीट गालीं, कां करुं गालबोट वेगळें ?

कुरकूर अतां कां ? भूक खरी लागली
मजजवळि यायचा त्यातें, 'घेउं दे' तया क्षणभरी"

एकेक लागली मिटूं नेत्रपाकळी
शिशुपाठ कशाचा ?-माता त्या दृश्यसुखा लोभली !!

---

## स्तब्ध कां उभा गडे !

स्तब्ध कां उभा गडे करीं धरून बांसरी ?
मंजुळ ते गीतनाद घुमव एकदां तरी !

श्रवतां ती मधुर तान
देहाचें सुटुनि भान

जाउं दे क्षणभरि हा मनविहंग अंबरीं !

नयनांतुनि अश्रुभार,

दाटुनि ये, सुटत धीर,

येउनियां जवळि करीं चित्तवृत्ति हांसरी !

घुमव तुझें गीत मधुर

जुळविन मी कंठस्वर

शिकविं मला ये अपुली अतुल सूर--माधुरी !

गाउनियां प्रेमगान

वृत्ति करूं एकतान

गात गात जाउंयां विरून शांति--सागरीं !----

स्तब्ध कां उभा गडे करीं धरून बांसरी ?

---

# किति दूरदूर गेलीस गडे !



**प्रणय--प्रभा**

किति दूरदूर गेलीस गडे !

हर्षोत्कट ही दिसते अवनी

दीपोत्सविं जन जाती रमुनी

परि उदास मम अंतःकरणीं

अंधार पसरला चोहिकडे—
किति दूरदूर गेलीस गडे !

प्रेमस्मृतीच्या मालेमधुनीं
उज्ज्वल रत्नें किती गुंफिलीं
हृदयीं त्यांची प्रभा फांकली

तो मोह पुन्हां जीवास पडे—
किति दूरदूर गेलीस गडे !

रात्रंदिन हृदयिंचा उमाळा
विषण्ण एकांतींच दाबिला
असह्य होतां विरह जिवाला,

दाबिलें आंतल्या आंत रडें—
किति दूरदूर गेलीस गडे !

सांग कधीं येशील परतुनी ?
मधुर भाषणीं, सुखद—स्पर्शनीं,
सुख—निद्रा भरिशील लोचनीं—

पसरून प्रीतिचे रम्य सडे ?
किति दूरदूर गेलीस गडे !

# भिकारीण

ही वेळ निजेची जागे कुणि कां घरीं
मज भिक्षा कोणी घालाहो मुठभरी

हतदैवाचें मी नवसाचें पाडस
मज देति भिकेचें वस्त्र कुणी राजस
जरि मळकें तुटकें....दानच ! हा मानस
जन म्हणती मजला पंकांतिल कुमुदिनी !

मज प्रथम बिजेची ओवाळणि प्रीतिची
परवानगी साऱ्या जगतीं हिंडायची
अन् कधिंहि घरासी परतुनि नच यायची
जनिं 'काजळ' फांसुनि नयन सुजल ढाळिती !

नच पावित्र्याची ज्योस्त्ना हृदयीं पडे
कुणि श्रीकांताची नजर तयाला घडे
घन काळाकाळा तिमिर इथें सांपडे
परि म्हणाति कुणी कीं वर्णच मम सावळा !

मज दुर्वचनांची मिळते जरि भाकरी
वरि अश्रुजलचा घोटच प्याया जरी

मी पदर पसरितें नका बोलवूं वरी
मुठ घालायाची घाला तिथुनी करीं !

---

## – संकोच –



( ओवी )

गाजताति दशदिशीं तुझ्या कीर्तीचे चौघडे
कैसें दावूं गाऊनीयां गीत माझें हें बापुडें ?

सुयशाचें गंगाजल खेळे तुझ्या मंदिरांत
कैसा अर्पूं पदांवरी आणियेला जलघोट ?

नवलाख रत्नदीप प्रकाशती तुझ्यावरी
चिमणी ही ज्योत कैसी ओंवाळाया घेऊं करीं ?

तुझ्या पाऊलांमागुती उमलतो फुलबाग
ओसाडीचें पानफूल तुज कैसी वाहूं सांग ?

काय बाई करूं तरी तळमळे माझा जीव
कैसा दावूं उकलोनी अंतरींचा भक्तिभाव ?

---

# आशा-गीत

( जाति-मेनका )

धीर मना देऊं कुठवरी धीर मना देऊं
ही हृदयविदारी हुरहुर निशिदिनीं सांग किती साहूं ?

अश्रुफुलें फुलतीं स्मृतीवरि अश्रुफुलें फुलतीं
निज निष्फलतेची जाणिव हृदया क्षणोक्षणीं देतीं

प्रीतीचा सिंधू उफाळे प्रीतीचा सिंधू
मज सांग आटला काय ? दिसेना एकहि जलबिंदू

विफल गमे शंका मनाला विफल गमे शंका
अति विमल प्रीतिची तव हृदयांतरीं वाहतसे गंगा

तेज चंद्रिकेचें अंतरीं तेज चंद्रिकेचें
परि वदनावरूनी हाय वेढिसी पटल खिन्नतेचें !

मधु-सौरभ भरला फुलांतुन मधु-सौरभ भरला
कां मिटुनि पाकळ्या धरिल्या ? भंवतीं वसंत हा फुलला !

स्फुरती हे अधर, वदाया स्फुरती हे अधर
परि मुखा वळवुनी शून्यामाजी लाविसी कां नजर ?

होसि वृथा श्रांत सखे गऽ होसि वृथा श्रांत
मज सांग कशाची आग पेटली कोमलांतरांत ?

आस मला नाहीं सुखाची आस मला नाहीं
तव जीवन सुखमय करणें हृदया आस हीच राही !

---

## चमकतो ध्रुवतारा



( ओवी )

चमकतो ध्रुवतारा
क्षितीजासी दूरदूर
माझ्या जिवा हुरहूर

उंचउंच अंबरांत
तळपते चंद्रज्योत
व्याकूळतें माझें चित्त

खोल खोल दरींतून
जलझोत झुळझुळे
आंत माझा जीव हले

दूरदूर ओसाडींत
पांखरांचें घुमे गीत
माझें चित्त भयभीत

कुठें शोधूं कुठें पाहूं
पुसटली भाग्य रेखा ?
कुठें माझा प्राणसखा ?

---

## सुख गोड शैशवींचें

चालः—आई म्हणोनि कोणी.

वाटे मला पुन्हां मी होऊनि बाळ यावें
सुखगोड शैशवींचें गमतें पुन्हां लुटावें

अंकावरी सुखानें निद्रा प्रशांत घ्यावी
येतांच जाग हास्यें— मातेस हांसवावें

दुडदूड स्वैर साऱ्या सदनांत धावडावें
खोड्या करून नाना लपुनी भयें बसावें

जरि रागवून माता पाहील एकवार
हळुवार बाहुपाशीं क्षणिं त्याच बद्ध व्हावें

अपराध नित्य होवो    परि घोर ना मनाला
मृदु झूल ती क्षमेची    लेवून शांत व्हावें
मुखिं बोल बोबडे ते    नयनांत भाव भोळा
दावून बाळरूपा    सकलांस तोषवावें
फेंकून प्रौढतेचें    ओझें हळूंच द्यावें
सुख गोड शैशवींचें    गमतें पुन्हां लुटावें

---

## मजसि आपुल्यासवें सांग नेशील ना ?

राग–असावरी

धरूनि हृदयांतरीं    प्रेममय भावना
मजसि अपुल्यासवें    सांग नेशील ना ?

' स्नेहलतिकेवरी
फुलवुं सुममंजरी '

सफल करिशील ना    हृदयिंची कामना ?
मजसि अपुल्यासवें....    सांग नेशील ना ?

हंसत कुसुमांसवें
सुकविण्यां आंसवें

तिमिरिं खिळवावया अंबरीं लोचनां
मजसि अपुल्यासवें सांग नेशील ना ?

सत्य शिव सुंदरा
जुळवुनी दो करां

पूर्ण करण्यास या प्राप्त नरजीवना
मजसि अपुल्यासवें सांग नेशील ना ?

---

## आई !

जातिः-अभिमन्यु

ठेवुनी अंकीं—अंकीं शिर आई
करूंदे मजला अंगाई धृ.

आजला शीण—शीण होइं भारीं
तापलों मी या संसारीं

लोचनीं अश्रू—अश्रु सांठतात
दाबितों तया आंत आंत

पोळिते आई—आई हृदयाला
उद्याच्या चिंतेची ज्वाला

शमाया आग–आग क्षणचि आई
करूंदे मजला अंगाई १

“ उद्याला पुष्पें–पुष्पें फुलतील
तयांची गुंफिन मधुमाळ

मनींच्या आशा–आशा त्यांसंगें
बहरतिल फोंफावुनि वेगें ”

गाइ मी, तोंच–तोंच हाय तेथ
फिरावा ग्रीष्माचा हात

परतुनी आलों–आलों मी गेहीं
करूंदे मजला अंगाई २

कुठवरी साहूं–साहूं ही दैना
अतां हा भार सोसवेना

कळा या देहीं–देहीं उठताती
पडेना पाउल हें पुढती

घेउनी अंकीं–अंकीं गा गान
विरूंदे त्यांत देहभान

ठेवि तव हस्त—हस्त शिरीं आई—
करूंदे मजला अंगाई   ३

---

## सुखस्वप्नांतुनि तुझिया मधुरे

( I arise from dreams of thee–Shelley. )

मंद मंद निश्वसितें टाकित पवन फिरे शीतल
नवतेजानें अहा न्हाणिती तारा धरणीतल

प्रहररात्र उलटली, जाहलें शांत शांत भोंवतीं
सुखस्वप्नांतुनि तुझिया मधुरे आली मज जागृती.

सुखस्वप्नांतुनि तुझिया सखये येतां मज जागृती
कसा कळेना सुधे पातलों तुझ्या मंदिराप्रती

अवकाशांतुनि शांत तमोमय, फिरे वायुवीचिका
चंपक–सौरभ विखुरे जैशी स्वप्नीं मधुभावना

चंडोलची कुरकुर विरली साखिच्या वक्षांतरीं
लीन जसा मीं प्राणवल्लभे तुझिया हृदयावरी

मस्तक फिरतें, हृदय गळालें, जीव विकल जाहला
या विपदेंतुनि सोडवि मजला धीर न लव राहिला

फिकट पापण्या तसे अधर हे जळती विरहानलें
चुंबनवृष्टी करुनि शांतवी ह्मणिं त्यांतें प्रेमले
पांडुरके हे कपोल थिजले, हृदय तसें धडधडे
घे हृदयीं त्या पुन्हां एकदां—तिथेंच तें भंगुदे

---

## प्रसाद

### भैरवी

कैसें करूं बोलूं काय । जिवा लागे तळमळ
प्रभो ! पूजनाची वेळ

रिक्तहस्तानें मी आले । कसा बोलूं याचनेला
प्रसादाची आस मला

एक आपुल्या चरणीं । प्रभो आसरा ठाऊक
दुज्या कोणाची ना हांक

आपुल्याच कृपेसाठीं । जीव देवा तहानेला
सोडुनीया मोहमाया

हृदिं पूजांचें अनंत । जल देवा सांठलेलें
दास न्हाणा त्याच जलें

प्रभो आपुल्या स्वरूपीं । त्याच जलांत विरून
एकरूप मी होईन

---

## विहार

—)—

**जाति–अवनी**

क्षणभरि तरि तोडुनियां विश्वबंधनाला
चल जाऊं विहरण्यास एकले वनाला

निघशिल तूं जावयास
येइन मी त्या क्षणास
सांगु नको परि निघणें कोणत्या क्षणाला

विकसित मी खुडिन सुमें
मन माझें त्यांत रमे
सांगु नको परि मजला रचण्यासी माला

करितां तूं स्तवनध्यान
तुजसमीप मी बसेन
सांगुं नको परि आळवुं कोणत्या स्वराला

स्फूर्तिमधें तूं रमतां
तुजसम जमविन कविता
सांगु नको परि कवण्या घेउं कल्पनेला

तूं पुढती, मी अनुचर
चल जाऊं दूरदूर
सांगु नको परि जाणें कोणत्या स्थळाला !

---

# नको जाऊं परतून



( ओवी )

नको जाऊं परतून क्षणभरी पाहूं वाट
कृष्णमेघ वर्षतील गगनाच्या मंडपांत

नको जाऊं परतून क्षणीं आपुल्या स्वागता
वनोवनीं डोलतील प्रफुल्लीत तरुलता

नको जाऊं परतून उमलेल अंतरंग
पानोपानीं फुलांतून खुलतील सप्तरंग

नको जाऊं परतून होऊनीयां उतावीळ
समीरण सौरभातें दशदिशीं उधळील.

नको जाऊं परतून उमलल्या अंतरांत
स्थापूनियां मूर्त तुझी गाईन मी प्रेमगीत

नको जाऊं परतून हृदयींची एक आस
तुजवरी होवो माझ्या जीवनाचा अभिषेक

नको जाऊं माझ्या देवा आस माझी अव्हेरून
क्षणभरी पाहूं वाट नको जाऊं परतून !

---

## — संक्रांत —

**जातिः-प्रणयप्रभा**

संक्रमण होउंदे करा त्वरा
संक्रांत पावली आज घरा

लोपूंदे शोकाची रजनी
हर्ष दाटुंदे अंतःकरणीं

जगतांत चहुकडे मोद भरा

त्याग भावना अंतःकरणीं
हास्य सुनिर्मल सुमधुर वाणी
तिळगूळ हाच स्वकरांत धरा

उच्चनीच हा भाव विरूंदे
'मी' 'तूं' ची भावना हरुंदे
विहरुंदे जगीं शांती मधुरा

रातकिडे स्वार्थाचे नुरले
दिवाभीत द्वेषाचें दडलें
प्रगतींत जगाचें भान हरा

नको वृथा तीं व्रतें तमोमय
विश्व–प्रीतिचें व्रत तेजोमय
दावील जीवना मार्ग खरा

---

## तुझा अधिकार

राग–सारंग

रानांवनांतून गेंद कुसुमांचे
आणिले कधींचे तुझ्यासाठीं

दरीदरींतून भरून ओंजळ
आणियेलें जल तुझ्यासाठीं

पंचप्राणांची या घालूनि साउली
ज्योत पाजळीली तुझ्यासाठीं

तुझ्यासाठीं फुले माझें भावफूल
जीवनाची भूल तुझ्यासाठीं

सेवनाचा देवा तुझा अधिकार
होउनि लाचार पाहसी कां ?

---

## हास्य

हांसत हा बाळ तुझा हास्य गालिं रंगलें
हास्याच्या माधुरींत दीन हृदय गुंगलें !

कमलाचा मधुमरंद,
दरवळला पुष्पगंध,
बोल गडे बघुनि यास देहभान हरपलें !

मुग्धभाव मधुलहरी
उसळति जणुं वदनावरि
जल–तुषार–नर्तनांत दुःख विरुनि चाललें !

हृदयींची प्रेम–ज्योत
वदनीं तेजा उधळित
तेजाच्या दिव्यरसीं तिमिरजाल लोपलें !

नयनांतुनि अश्रु दोन
गालिं येति ओघळून
हास्याचें मृदुल किरण त्यांतुनि गे प्रगटले !

वितरे त्या किरणांतुनि
पावनता हृदयांगणिं
हास्यपूर्ण विश्व गमे या क्षणास प्रेमले !

---

## वृथाच जीव भागला !

( भैरवी )

अखेरचाचि हा तुला
सवाल टाकितों खुला
मधुर मधुर बोलुनियां वंचिलेंसि कां मला ?

फुलवुनी स्वयें कलिका
गुंफिलीस मालिका
    फूल फूल आज पदीं चुरुनि टाकिलेंसि कां ?

दिव्य प्रीति-अंबरीं
विहग रंगला परी
    हंसत हंसत खेचुनि कां आणिलास भूवरी ?

मोहजाल गुंफुनियां
मारिलेंसि या हृदया
    दूरदूर आज परी लोटिलेंसि कां तया ?

भाग्यकाल संपला !
लव न ये दया तुला !
    रोज रोज गाउनी वृथाच जीव भागला !

---

## जीवन-प्रभात

( ओवी )

झाली बाई प्रातःकाल
    पाखरांची किलबील
    बाळ करी चुळबूळ पाळण्यांत

झाली बाई प्रातःकाळ
मावळला शुक्रतारा
नुरे चिंतेलागीं थारा माझ्या मनीं

झाली बाई प्रातःकाळ
वारा वाहतो भरारा
माझ्या भोंवतीं पसारा तान्हूल्याचा

झाली बाई प्रातःकाळ
पूर्वदिशा करी साज
बाळ करी हितगूज आपुल्याशीं

झाली बाई प्रातःकाळ
भरे विश्वांत आनंद
मज राजसाचा छंद दिनभरी

झाली बाई प्रातःकाळ
बाळ करांत हांसला
भाग्यरवी उगवला जीवनांत !

---

## तुझी प्रीति

( ओवी )

घनदाट काळोखांत
रानोवन कोंदाटलें

तुझ्या प्रीतीच्या तेजांत
विश्व माझें उजळलें १

तळपत्या सूर्यतेजें
कोमेजली पुष्पमाला

तुझ्या प्रीतीच्या वृष्टींत
मोहरून जीव आला २

प्रलयाच्या सोसाट्यांत
गढूळती जलकण

तुझ्या प्रेमगंगेमाजी
जीव जाहला पावन. ३

भूकंपाच्या आघातानें
हादरतो विश्वगोल

तुझ्या प्रीतीचा आसरा
सांवरीतो माझा तोल. ४

जीवनाच्या कोलाहलीं
विश्व जागेंचि अजून

सख्या तुझ्या प्रेमगानीं
झोपलेलं माझं मन ! ५

---

## महाकवि शेले



पद धरणीतलिं राखोनी
हा विहरे स्वर्गामधुनी

हा सुगंध सुमनां मधला
कीं सुरंग संध्येमधला

जणुं जललहरी जलधींची
मूर्तरूप घेइ सदाची

हर्षशोक यातें नुरले
व्यवहार जगींचे विरले

देहाचा कवि मुलाजा
सौंदर्यपुरीं हा राजा

उज्वलतर प्रतिभा राणी
गातसे तया मधुगाणी

आनंद अमर हृदयींचा
उधळिते तयाची वाचा

दिव्याचा मंगल छंद
निखळवी जिवाचे बंध

मानिं खेद न, देहं नुरला
तरि अवघ्या विश्वीं भरला

## विजयी वीर



**जाति--भूपतिवैभव.**

**ती** " भुलनियां मला कां सोडियली जनरीत ? "
**तो** " तूं जिथें जिथें मी हीच जगाची रीत ! "

" तंव दृष्टिआड मज गमतें दूर छपावें "
" या सुलभ उपाया त्वरित करून पहावें "

" मी कलिका होउनि पर्णांआड दडेन "
" मी वसंतवारा होउनि तुज धुंडीन "

" जलधारा बनुनी मेघोदरिं विहरेन "
" मी विद्युत बनुनी भूवरि तुज खेचेन "

" दंवबिंदू बनुनी लपेन गवतामधुनी "
" रविकिरण बनुनिया टाकिन तुज शोषूनी "

" मधु मधुर होउनी राहिन कुसुमांमधला "
" मी भ्रमर होउनी येइन मधुपानाला "

" मग बसेन छपुनी मी माझ्या हृदयांत "
" 'तू' बनून तुजला शोधिन मी निमिषांत "

**ती** " नित हारविसी मज कुटिला ! वादविवादीं "
**तो** " तरि विजयी वीरा बक्षिसास कां बंदी ? "

---

# आनंदगीत

चाल--साजणि चल ये ( प्रेमवीर )

हांसत नाचत गुंफुं करांस सखयांनो ।

उमलत विलसत झुलति फुलें

त्यांसम कणकण उधळुं सुखास सखयांनों ।

भयकर गरजति जलद नभांत

मानस क्षणभर होइ उदास

तम भरें । नाशुंया त्वरें ।

हर्षनिर्भरें

जगत हें हांसवूं या गडे

रंगवुं दंगवुं विपिन–विलास सखयांनों

हांसत नाचत गुंफुं करांस !

अंबरिं शामल नाचत येइल तारांचा परिवार

त्यांसह घेइल विमल सुधामय शशिराजा अवतार

मंगल त्या क्षणिं । नाचुनि गाउनि

मिळवूं स्वर्ग घरेस सखयांनों

हांसत नाचत गुंफुं करांस !



राका

# कशि येउं गडे माघारी ?

राग--**सारंग**

घेतली उडी संसारीं । कशि येउं गडे माघारी ?

घुमवीत अहा वनराई
स्वच्छंदें कोकिल गाई
थबकलें चित्त त्या ठायीं
जरि खुपतो तीर जिव्हारीं । कशि०

जरि कंटक भंवतीं भरले
व्याघ्रादिक हिंस्रहि दडले
मज भान तयांचें नुरलें
भयभीति न हृदय विदारी । कशि०

बावरुनी जीव बिचारा
हैराण शोधितां थारा
निज तेजें नभिंच्या तारा
उजळिती रात्र अंधारी । कशि०

दिनरात्र निसर्गासंगें
हिंडेन रविशशीमागें
लाभेल अंतिं मजला गे
आसरा प्रभूच्या द्वारीं । कशि येउं गंड माघारी ?

---

# निद्रागीत

चालः–मम जीवा रमवाया

किति चाळा, निज बाळा,
छकुल्या तूं गुणि बाळ ना !
उदरीं जिवाला ताप तुझ्या रे जाहला
म्हणुनि गमे, सुखशांती
तुज लाभो शुभकालिं या !
प्रिय सुजनांचा
वृंद गृहाला पातला
सकलांच्या मनिं प्रेमा
तुजसाठीं बघ दाटला !

बागबगीचा
म्लान कधींचा जाहला
बालरवी उदया तूं
येतां तो आजि उमलला !

निधि सुगुणांचा
होइ जिवाच्या जीवना
जगपाला प्रतिपाला
शिशुला या, पदिं प्रार्थना !

निज बाळा,
छकुल्या तूं गुणि बाळ ना !

---

## आज

—0—

( ओवी )

जाऊनियां उपवनीं
चल गुंफूं पुष्पमाल
उद्यां वेली वठतील

निळ्या निळ्या जलाशयीं
एकमेकां पाहूं चल
उद्यां उठेल वादळ

मावळत्या सूर्यतेजीं
तोडूं जिवाचीं बंधनें
निशा येईल क्षणानें

निसर्गाच्या मंदिरांत
चल करुं एकमेक
जीवनाची आणभाक

प्रेमभरें फुलवूं या
चल सख्या आला क्षण
देईल तो संजीवन !

---

## माझीं फुलें

(सुनीत)

वसंत समयीं उद्यानांतुनि अमित सुपुष्पें फुलती
हंसतीं झुलती पवनावरती परिमल विखरुनि देतीं

परि मजभंवतीं पहा उमलतीं जीं पुष्पें सुकुमार
सानथोर जीवांस तयांचा मोह पडे अनिवार

अंकावरि मम अहा खेळते छकुली ही माईची
अक्काचा लडिवाळ पाठिशीं झटे उभा व्हायासी

कोण रांगते त्या तिकडे ? हंऽ ही ताईची बेबी
हा दादाचा राजा बसला फुगवुनि गाल गुलाबी

हांसहांसुनी हुंकार देते चिमणी अंकावरची
उभी राहते परि कोसळते स्वारी ही बाळाची

किती आवरूं या बेबीला ? करिते हलकल्लोल
पुरा रंगला राजा उधळित अस्फुट साखरबोल

किती गोड हीं पुष्पें देवा फुललीं माझ्या गेहीं
विसरुनि जगता फुलेन कधिं का
या पुष्पांसम मीही ?

---

# भाग्यवंत पाडवा !



भारतांत होउंदे साजरा भाग्यवंत पाडवा !

प्रथम होउंदे होळीचा सण
दौर्बल्याचें घालुनि सर्पण
हिंमतीची मग धूळ सुमंगल धुळवडीस कालवां ।

उत्साहाच्या गुंफा माळा
गतस्मृतींचे दीप पाजळा
राष्ट्रप्रीतिचे गगनचुंबि ध्वज घरोघरीं फडकवा !

जा समरांगणिं नरनारीगण
द्या परसत्ता स्वपदीं तुडवुन
स्वातंत्र्याच्या आणा लुटुनी भव्य दिव्य वैभवा !

यशोगीत अवघें धरणीतल
'जयभारत' जयशब्दें गाइल
इतिहासाचीं भरतिल पानें सुर करितिल वाहवा
कधीं असा उगवेल भारतीं भाग्यवंत पाडवा !

---

# मनोविहंगास

तें गीत अमंगल पुन्हां पुन्हां गाउनी
उभविसी कशाला अश्रु अतां लोचनीं ?

दुखविली कितिकदां अपुली नाजुक चोच
शिणविले कितिकदां अपुले इवले पंख
हृदया न दया परि शिवली या क्षण एक
जाणीव उरीं ही खुपते शल्याहुनी !

झिडकारुनि देसी मेवा नानापरी
सौगंधिक जल तुज रुचलें ना कधिं, परी—
कळलें न कशाची आस तुला अंतरीं
हांसलें तुला मी मूढपणें निशिदिनीं !

आक्रंदित अपुलें शोकगीत पंजरीं
खिळविसी आपुली खिन्न नजर अंबरीं
नयनांतुनि झरती अविरल अश्रूसरी
अजुनि हें ढळेना करुणचित्र स्मृतिंतुनी !

परि ज्योत तळपती अंतरांत ठेवुनी
निज स्वातंत्र्याची साधाया पर्वणी
तूं धाव अंबरीं घेतलीस, त्या क्षणीं
फांकलीं सुखाचीं किरणें मार्गांतुनी
उभविसी कशाला अश्रु अतां लोचनीं ?

---

## गोफाचें गाणें



चालः--चल लगबग (छाया)

सकल मिळुनि हंसुनि खुलुनि गोफ गुंफुयां ग ऽ
पदर पदर स्वकरिं धरुनि नाच नाचुंया ग ऽ

नाचताति पवनिं फुलें
डुलति सुमपराग खुळे

चपलचरणिं त्यांस खुडुनि आजि आणुयां ग ऽ
सकल मिळुनि हसुनि खुलुनि गोफ गुंफुंया !

वर्षवर्षताति मेघ
जलधारा झरति सुभग



राका

लपत छपत स्वकीर अमित त्यांसि वेचुंया ग ऽ
सकल मिळुनि हसुनि खुलुनि गोफ गुंफुंया !

मधुर गान गाउनियां
प्रेमरंगिं रंगुनियां

गोफ विणुनि सुजन–चरणिं आजि वाहुंया ग ऽ
पदर पदर स्वकारिं धरुनि नाच नाचुंया !

---

## नको काढूं आठवण



ओवी

ग्रीष्माचिया तीव्र तापें
फुलें गेलीं कोमेजून
नको त्यांची आठवण

आषाढींचा मेघपुंज
कोर गेला झांकळून
नको तिची आठवण

शिशिराच्या वाऱ्यासंगें
गीत गेलें विखरून
नको त्याची आठवण

झुळझुळता ओहळ
गेला वनींच सुकून
नको त्याची आठवण

प्रीतिभरें उजळलें
तुझें माझें मनोमन
नको काढूं आठवण !

— -

## स्मृति–समाधीवर

मान टाकलेली, स्कंधिं या तशी गळुनि गेली,
हास्य विकसलेलें, थिजुनिया तसेंच हें गालीं,

हृद्गत बोलाया, अधर जे अधिर अलग केले,
परि हतदैवानें, निमुट ते तसे मिटुनि गेले,

एकदाचि बोल, सानुले अस्फुट ते बोल,
क्षणभरि तरि हास, हास्य तें तुझें लाखमोल,

२

कीं तुज काळानें, एकली पाहुनि सुकुमार,
पाश टाकियेले, तुला जे खुपती अनिवार,

सांगत होते ना, पांखरा दूर नको जाऊं
नेत्र फाकुनीया, कुठें रे दूर नको पाहूं,

परि न ऐकिलेसी, ओढुनी दुष्टानें नेली,
अमित यातनांनीं, तनू का करपुनिया गेली.

३

कष्ट सोशिलेसी, पाडसा फार भागलासी,
सोडुनि विश्रांती, बोल ना कुठे चाललासी ?

मार्ग जिथें नाहीं, माजला अंधकार भवती
दया क्षमा नाहीं, जिथें ना प्रेमाची वसती,

बोल पाडसा रे, जाशि कां अशा प्रदेशांत ?
नको नको जाऊं, गळ्याची आण तुला तेथ !

४

कशी चाललीस, लाडके, टाकुनि मातेस,
सद्दढ प्रेमाचे, कसे ग ऽ बंध तोडलेस ?

आम्हां मानवांना, जगीं या दिसलें जें नाहीं,
सांग मला बाळे, तुला ग ऽ दिसलें कां तेंही ?

म्हणुनी मातेची, हांकही झुगारून दूर
चाललीस बाळे, नको ग ऽ नको परत फीर,

नको अशी जाऊं, कष्टवूं नको मृदु जिवाला,
सांग मला कोठें जावया, जीव तहानेला,

मार्ग चालतांना जेथला, वीरही डगमगले,
जाशिल तूं कशी, एकली सांग मला बाळे,

नको पुढें जाऊं, तेथुनी शब्द तरी बोल,
सोबत मी येते, थांबना थांब जरा बाळ.

५

म्हणती जन मजला । लाडके सोडुनि तूं जाशी ।
पुन्हा कधीं नाहीं । तेथुनी परत फिरायाची ।

परि त्यां नच कळणें । सोडुनी कैशी जाशील ।
प्रेमाचे आपुल्या । बंध तुज कसे सोडतील ?

अज्ञ लोक त्यांना । कळेना रीतच प्रेमाची ।
प्रेम अमर आहे । जगाच्या नश्वरतेमाजीं ।

६

प्रेमाचे पाश । लावुनी नको जिवा घेऊं ।
दिव्यत्वाकडुनी । लाडके परत नको येऊं ।

तुझ्या चिंतनांत । निशिदिनीं हृदया रमवोनी ।
भग्न मानसानें । जगाचीं कर्तव्यें करुनी ।

शोधित मार्ग तुझा । भेटण्या अंतीं तुज येते ।
हृदयें जुळवोनी । गाउनी प्रेमाचीं गीतें ।

करांत कर घेऊं । मिळुनिया दिव्यतेस जाऊं ।
नका, प्रभो आतां । जिवाचा अंत नका पाहूं ! !

---

# गीत

जाति–**भूपति वैभव**

गाईन तुला मी माझें मंजुळ गीत
मन रिझवायाची अनुपम माझी रीत

हे अश्रु जातिल नयनांतुनि माघारी
खिन्नता जिवाची मावळेल ही सारी

येतील फुलोनी आशांच्या सुममाला
जग मंगलमय हें गमेल तव हृदयाला

हृदयींची तळमळ होइल सारी शांत
गातांच तुला मी माझें मंजुळ गीत

या म्लान तरुलता उभविती कटु आभास
अंतरीं तयांच्या दडला परि मधुमास

पसरिते काजळी जन हृद्यांत निशा ही
छे, फिरवि जगावरि रवितेजाची ग्वाही

गाईन तुला मी हें सारें दिनरात
मन रिझवायाची अशीच माझी रीत

ऐकवीन तुज मी तारांचें मधुगान
करिशील श्रवण जें हरपुनि तनुमनभान

तें मंगल मंदिर तुज पुढती उभवीन
जीवात्मा अंतीं होई जेथ विलीन

घेशील भरारी विहंगमा गगनांत
गातांच तुला मी माझें मंजुळ गीत !

---

## बंधमुक्त

Bird, Oh my bird; listen to me; do not close your wings.
—Tagore.

सांज आली जाहलें मूक गीत
सखे गेले परतून होसि श्रांत

भयद मेघें व्यापिलें नभ तरी रे
पंख घेउं नको मिटुनि पांखरा रे

कालसर्पासम जलधि हा उफाळे
पुष्पनर्तन ? छे फेंस धरी जाळें

तीर नुरलें, घरकूल लोपलें रे
पंख घेउं नको मिटुनि पांखरा रे

रात्र एकाकी ठाकली समोर
उषा अजुनी पेंगते सख्या दूर

चंद्र हांसे निस्तेज, झुरति तारे
पंख घेउं नको मिटुनि पांखरा रे

भीति, आशा—नच ! शब्दहीन सारें
गृह न, शय्या ! छे, संपले पसारे,

पांख तूझे, तुज खुलें गगन सारें,
पंख घेउं नको मिटुनि पांखरा रे !

---

## ते बंध कसे तुटतील क्षणीं ?

( प्रणयप्रभा )

जाईल उद्या सारें पुढुनी
पाहुंदे मला डोळे भरुनी

प्रवासास दुरच्या निघालें
अवाचित मार्गीं तुजसि देखिलें

निमिषांत जिवा बनलास धनी !
रम्योद्यानांतुनि मज नेसी
विमल जलाशय हंसुनि दाविसी
मन ओढ घेतसे फिरफिरुनी !

नील नभीं चंद्रकोर हांसे
विशाल खाली सागर नाचे
शांतींत जीव जाई विरुनी !
थांब जरा—हळुंहळूं प्रेमला
नकळत ये जडता चरणाला
बघ नजर कशी राही खिळुनी !

प्रवास पुढचा अनंत अपुला
परी इथें जोडिला जिव्हाळा
ते बंध तुटतील क्षणीं ?—
पाहुं दे मला डोळे भरुनी !

———

# बंदिवान्



**जातिः-मनमोहन**

थांबवी गायका आतां हें अपुलें मधुर गान्

त्वदिय सूर श्रवणीं येतां
घेतली धांव त्याकारितां

पारि हृदय धडधडे माझें क्षण नुरलें देहभान्

लागले समोरी नेत्र
परि वृत्ति कुठें अन्यत्र

चालला वेळ बघ वाया मनिं घुमते तीच तान्

दुर्दैव पसरलें सारें
शिरिं कर्तव्याचे भार

संसारिं रूढीची झालें मी गृहिणी बंदिवान्

विनवितें पसरुनी पदर
छळुं नको निघुनि जा दूर

परि एक धरुनि जा ध्यानीं—तूं माझें सुखनिधान् !

---

# माझी फुलबाग

माळिण व्हावें फुलबाग रम्य फुलवावे धृ०

**निर्मळ** माझ्या **मनो**अंगणीं
**पावित्र्याचें** खेळे पाणी
**मनोनिग्रहें** बांध घालुनी
पाट काढावे फुलबाग रम्य फुलवावे १

महापुरुष जन्मले भारतीं,
**विचार** त्यांचे वाऱ्यावरतीं
उडुनि विखुरतां माझ्या शेतीं;
त्यांस रुजवावे फुलबाग दिव्य फुलवावे २

**निष्कामाचा** शुभ्र मोगरा
**स्नेह** सुकोमल गुलाब गहिरा
पारिजात **सद्भाव** साजिरा
नित्य बहरावे फुलबाग रम्य फुलवावे ३

**दया, क्षमा** या जुई चमेली
**शांति**—स्वरूपीं **जाई** नटली

देखुनि माझी बाग डंवरली
पांथ डोलावे फुलबाग असे फुलवावे ४

**सत्-चिद्-आनंदाचा** परिमल
त्या पुष्पांत भरावा अविरल
पावन व्हावें तयें अवनितल
प्रभो हें द्यावें मम जीवन सफल करावें ! ५

---

## उंच उंच अंबरीं !

उंच उंच अंबरीं विहंग रंगला अतां
अंतराळिं कां उगाच मोहपाश फेंकितां ?

भूवरिची पुष्पमाल
रुचलि न त्या अल्पकाल
बहरली नभांत वेल
खुडित तारकासुमांस दिव्यहार गुंफितां
विहंग रंगला अतां

नकोत रान निर्झरी
कौमुदी झरे वरी
क्षुधातृषेस संहरी
हिमधवलित किरणरसें कोमल तनु नाहतां
विहंग रंगला अतां !

तरुशाखा त्या नकोत
भव्य मेघमंदिरांत
होई तो निद्रारत
स्वर्गसौख्य तें अपार दे जिवास शांतता
विहंग रंगला अतां

गाउनियां प्रेमगान
नुरलें त्या देहभान
एकरूप जन्ममरण
व्यापुनी चराचरांस राहिली प्रफुल्लता
उंच उंच अंबरीं विहंग रंगला अतां !

---

# सुखद भाग्य

चालः—चंद्र चवथिचा

विश्व शांतलें
गगनसरीं हंसत चंद्रबिंब एकलें
हास्य उमटलें
विमल अधरिं तेंच, जरी बाळ झोंपलें
चिमुकल्या करीं
निद्रित हा बाळ मदिय अंगुली धरी
स्वप्न—मंदिरा
जावयास काय निघे बाळ गोजिरा ?
मार्ग तेथला
परिचित ना म्हणुनि सवें नेइ कां मला ?
रंगलें पुरी
स्वप्न—रंगिं यासम मी शैशवीं जरी,
स्वप्न भंगलें
आज इथें मम गुलाब कंटकीं फुले !

हास्य संपलें
आज प्रखर जीवन हें भंवति पसरलें !

बाळ ! तुजसवें
क्षणभरांत लोचनांत सुकति आंसवें !

अशिच ने मला
जन्मभरी जुळवुनि कर स्वकरिं प्रेमला !

स्वर्गिं ज्या फुला !—
विहरसि तो देखण्यास जीव लोभला !

*     *     *

पुण्य सांचलें,
म्हणुनि असें सुखद भाग्य भालिं रेखिलें !

---

## – पूजा –

—0—

चालः–झिम्मा खेळूं ये

गीत गाऊं ये ग    फुलें वेचुं ये
प्रेमगुणीं तुझा माझा    हार गुंफूं ये

कोंदाटल्या काळोखांत
उजाडल्या ओसाडांत
आपुलीया प्रकाशाचा झोत दावूं ये

रानोवनीं कड्यांवरी
श्रांत झाले कोणी तरी
स्नेहजलें प्रफुल्लीत त्यांसी करूं ये

निराशेच्या गर्तेंतून
सागराच्या खोलांतून
बुडती त्यां उत्साहाची साद घालूं ये

चल जेथें अवकाळीं
आग पोटीं पेटलेली
मुखांतील घांस एक तेथें घालूं ये

विश्व आपुलें मंदीर
सखे तेथें जोडूं कर
तुझ्या माझ्या जीवनाची ज्योत लावूं ये
प्रभूपदीं तुझा माझा हार वाहूं ये !

# खडे वेंचिले पण !

चाल--फुलें वेचलीं पण-चा

[ चोरून ऐकिलेल्या प्रेमकहाणीचें वर्णन चोरूनच करायला हवें ! ]

फर्ग्यूसनची अखिल टेकडी घालुनि पायाखालीं
खडे वेंचिले तऱ्हेतऱ्हेचे येउनि सांजसकाळीं

हिरवे पिवळे निळे जांभळे लालस माणिकमोतीं
फिकट पारवे शुभ्र काजळी कितिक तयांच्या जाती !

खड्याखड्यांनी ओंजळ माझी भरुनी लागे शींग
रमलें नवरंगांचा नाचे हातावरती ढीग !

काव्यभरानें तरुणनयन हे नवतेजानें न्हाले
प्रणयरसानें हृदयहि माझें उचंबळुनि वर आलें !

" खडे वेंचिले—पण आतां ते फेंकूं कोठें खालीं ? "
राक्षसवृत्ती स्मरणदेवता क्षणांत जागी झाली !

सुट्टी झाली वस्ति-गृहांतुनि आतां कोणी नाहीं !!!
मोडुनि पडलें हृन्मयमंदिर शतधा आघातांहीं

अखिल सुट्टिचे दिन कां माझे रुक्ष चिंतनीं जावे
संकल्पाचि हा काय ठरविला ? कां तें दैवा ठावें !

कड्यावरी या कोमल हृदया टाकुनि देवा क्रूर
कुठें खड्यांच्या धनिनी माझ्या दिल्या दवडुनी दूर !

वृत्ति बावरी झालि, आंतल्या आंत बिचारी रडली
जीवाचीं नयनांतुनि पुष्पें त्याच खड्यांवरि पडलीं !

जीव जाहला जड, ती जडही रास खड्यांची झाली
खडे वेंचिले — पण—पण आतां
देतों टाकुनि खालीं ! ! !

---

## सहचरीस :

( जाति--प्रणयप्रभा )

आक्रमीं आपुला मार्ग गडे !

तूं मजला, तुज मीच एकला
अपरिहार्य हा प्रवास अपुला

जरि अफाट जल हें चोहिकडे
आक्रमीं आपुला मार्ग गडे !



गाका

खळबळुनी जलवीचि उसळती
धैर्यें परि तूं होउनि पुढती
घे झुंज जलाशीं हंसत गडे !
आक्रमीं आपुला मार्ग गडे !

घाबरूं नको बावरूं नको
ध्येय हृदयिंचें विस्मरूं नको
चल मार कर जलीं पुढेंपुढें
आक्रमीं आपुला मार्ग गडे !

पैलतीर बघ निकटिं पातलें
दूरवरी क्षण एक प्रेमलें
यश–नौबत घनगंभीर झडे
आक्रमीं आपुला मार्ग गडे !

प्रेमपूर्ण शांतींत जिवलगे
सुखदुःखांचे विरतिल धागे
जणुं चिरानंदिं हा जीव बुडे
आक्रमीं आपुला मार्ग गडे !

---

# दयाळा ! —

राग--**मालकंस**

सेवा घे मानोनि दयाळा !

आणूं चंदन—गंध कोठुनी
सुगंध तिळभर नुरला सदनीं
लज्जान्वित हा जीव जाहला !

जाइ जुई नव गुलाब फुलला
दिव्य तयांची रचुनी माला
साधुसंत अर्पितात तुजला !

हीनदीन मी क्षुद्र पातकी
रानफुलें फुललीं मजभंवतीं
तींच वेचुनी हार गुंफिला !

बाळें अपुलीं सुगुणि दुर्गुणी
भेद माउली धरि ना स्वमनीं
म्हणुनि दयेवरि जीव लोभला
सेवा घे मानोनि दयाळा !

---

१

राग:--भूप. त्रिताल.

( चाल:—आज मेरे घर० मा. कृष्णराव )

गाइं गुणगानिं सतत रघुराज
भुवनिं विफल गणिं त्याविण काज ॥

समज पतित-शरणागत-तारक
प्रभु हा निशिदिनिं सुजन-सहायक
परम उदार-चरित रघुराज ॥ १ ॥

---

२

राग:दरबारी कानडा. त्रिताल.

( चाल:—समजत ना मन तू )

चमकतसे चपला गगनीं ।
व्याकुल होई मन भयकंपित
अश्रु झरे नकळत नयनीं ॥

घनतिमिरीं जग विरलें भवतीं
विफल स्मृतींची हृदयीं दाटी
विकट हास्य परि हांसुनि वरि ती

दावित वाकोल्या फिरफिरुनी
चमकत ही चपला गगनीं ॥१॥

---

३

राग:-मांड. एकताल.

मजवरि कां रुसलासी
करुणाघन म्हणवींसी ॥
गुंतुनियां भवपाशीं
मुकलें शांति-सुखासी
हुरहुर हीच जिवासी
मजवरि कां रुसलासी ॥१॥

---

४

राग:-बागेश्री. एकताल.

क्षणभरि हरि तुजविना
विसावा न जीवा ॥
दृष्टि फिरे भंवतीं
भिरभिर दिनरातीं
चरणलाभ व्हावा ॥१॥

५

राग:--खमाज.

( चालः--सब सखियां मिल० )

प्रभुविण जीवन असार भासे
देखिन चरण सुकोमल कैसे ॥

प्रभुकृपेनें नटुनि चराचर
देखत मजसि गमे उपहासें ॥१॥

---

६

राग--मांड. घुमाळी.

( चालः—हांस हांस हांस बाळे. )

हांस हांस हांस पुरवी
अंतरींचि आस ॥

हांसते प्रमोदें धरणी
हांसतो शशी हा गगनीं
रंगु दे तुझ्या मधुवदनीं
हांसरा विलास ॥१॥

---

७

रागः—तिलंग. त्रिताल.

प्रिय एक तुझा सहवास
त्याविण नुरली आस जिवास ॥

रूप लोचनीं तुझें निशिदिनीं
भवभय नेई पार लयास
प्रिय एक तुझा सहवास ॥१॥

---

८

रागः—गौडसारंग. एकताल.

( चाल—मांडि खबरे ऽ )

शांति—सुख दे
जनांसि देवि शारदे ॥

हृदयीं स्फुरवी विचार
स्फूर्तिस वितरी अपार
मंगल गुणगान
गावया मुदें ॥१॥

---

९

राग–पटदीप. झपताल.

( चाल–अधिरमन० )

जगतिं या आसरा

तूंचि पतिता खरा

तूंचि माता पिता प्रेमरस निर्झरा ॥

नित कृपा-सिंचना

करिसि करुणाघना

हरुनि अघभावना

फुलविसी अंतरा ॥१॥

---

१०

राग–दुर्गा. त्रिताल.

( सम–नी या अक्षरावर )

चला घेउनीया करीं पुष्पमाला

नमूं शारदेला करूं स्वागताला ॥

धरूं ज्ञानदीपा

करूं आरतीला



राका

तया सुप्रकाशीं विनाशूं तमाला
नमूं शारदेला करुं स्वागताला ॥१॥

---

११

राग—बहार. त्रिताल.

( चाल—कैसी निकसी० )

उधळित हास्य वसंत सुमांतुन
मोदभरें विकसित होई मन ॥

भक्तिज्योत तेवते निरांजनिं
भावसुमांची माला गुंफुनि
स्नेहरसा नैवेद्य गणोनी
सकल मिळुनि करुं गौरीपूजन
उधळित हास्य वसंत सुमांतुन ॥१॥

---

१२

राग—कर्नाटकी. त्रिताल.

( चाल—जगजीवना करुणाघना. )

नमुंया सदा श्रीशारदा
वंदूं पदा चिरसौख्यदा ॥

भय जीवना न शिवो कदा
प्रगतींत पावो लय आपदा ॥१॥

---

१३

राग--**मालकंस. त्रिताल.**

गाइ तुझे गुण अखिल चराचर
परम दयाघन हे चिरसुंदर ॥
जलधारा शिरिं जलधर सिंचित
अर्पिती लता सुमें सुगंधित
लीन मनुज तव चरणिं नमुनि कर
गाइ तुझे गुण अखिल चराचर ॥१॥

---

१४

राग--**बागेश्री. झपताल.**

( चाल—अतां राग देई० )

तुझ्या नामगानीं मना शांति लाभो
तुझी मूर्ति हृन्मंदिरीं नित्य शोभो ॥
रामचंद्रा तुझ्या सुगुणसंकीर्तनीं
जन्मजन्मांतरीं जीव जागो ॥१॥

१५

राग–पटदीप. त्रिताल.

रजतरांगीं नटलें वसुधातल
मंदमंद ये पवन सुशीतल ॥

बघुनि कुमुदिनी फुलतिं जलांतुनि
हृदयिं प्रीत झरते मधुमंगल ॥१॥

---

१६

राग–यमन. त्रिताल.

( चाल—" सौख्यसुधा वितरो " प्रमाणें कांहींशी )

गुरुचरणीं अजि हें अभिवंदन
मोदभरें विकसित होई मन ॥

अल्पमतीच्या बालिश लीला
परिसुनियां होवो मनरंजन ॥१॥

१७

राग--काफी. त्रिताल.

( चाल—ना मारो पिचकारी )

भूल कशी पडली जिवाला
अजुनि येइना मुरलीवाला ॥

" मंजु मधुर हरि वाजवि बासरि "
अधिर विनविती गोपीबाला ॥१॥

---

१८

राग–भैरव. झपताल.

( चाल— होय संसार तरु )

ऊठ सखि पातला भानु उदयाचलीं
मधु मधुर गायना करित विहगावली ॥

कालिं मंगल अशा सुखशयन त्यागुनी
वाहि त्या प्रभुपदीं दिव्य सुमनांजली ॥१॥

---

१९

राग--तिलंग. द्रुत एकताल.

मधु मुरली वाजवि रे
आत्मभाव तींत विरे ॥

प्राशुनि ती नादसुधा
अमर बने ही वसुधा
स्वर्ग भूवरी वितरे
मधु मुरली वाजवि रे ॥

---

२०

राग--भैरव किंवा यमन. द्रुत एकताल.

मानुनि घे देवि भाव
दीनासी त्वरित पाव ॥

तात जननि तूं जगास
वंदनीय सुरवरांस
याचितों पदांबुजास
लाभो तव प्रेमविभव ॥१॥
मानुनि घे देवि भाव

---

२१

राग--**भैरवी.** **त्रिताल.**

यदुनंदना झणिं धाव ना
पळ धीर ना अधिऱ्या मना ॥

भवसागरीं मति बावरी
छळिती जिवा कटु भावना ॥१॥
यदुनंदना झणिं धाव ना !

---

२२

राग--**मांड.** **त्रिताल.**

प्रभुगुणगान मोहि मना
हरपवि तनुमन भान ॥

शोधित निशिदिनिं हें वेडें मन
तें चिर-प्रेम-निधान ॥१॥

---

## २३

राग--पिलु. त्रिताल.

( चाल---बालम नैना लगे चलेजा. )

रुसला कां सखि नंदकुमार ॥

मंजुळ मुरली अधरिं न धरिली

करितो व्रजिं न विहार ॥१॥

विनवि राधिका ‘ सोडिं अबोला

हृदय तुझें हळुवार ’ ॥२॥

रुसला कां सखि नंदकुमार

---

## २४

राग--बागेश्री-किंवा दुर्गा. झपताल.

( चाल—विनती सुनो मोरि. )

तुझिया सुगुणगानिं

रमुं दे सतत वाणी

याचना प्रभुचरणिं

करित मन निशिदिनीं ॥

विपदा भवीं अमित

करिति मति भयभीत

आधार जगतांत

नामनौका गणी ॥१॥

---

२५

राग—भैरवी. त्रिताल.

( चाल—कांहींशी ‘ जागिं आभास हा० ’ सारखी )

मनिं आशा वृथा लाविली

मोहाकुला वृत्ति ही जाहली ॥

अजुनी वनीं येसि ना श्रीहरी

कां पोळिसी जीव चिंतानलीं

मनिं आशा वृथा लाविली

---

२६

राग—खंबावति. एकताल.

रमवि अखिल विश्वगोल

गुणगानीं हे दयाल ! ॥

वीणारव प्रेमरूप

झंकारुनि धरिल ताल ॥१॥

---

२७

राग--देस किंवा पटदीप. एकताल.

नमन चरणांबुजीं बालिका तव करी
स्वार्थ भय ग्रासिती त्वरित त्यां संहरी ॥

प्रेमपूजा घडो
सतत मनमंदिरीं
वरद कर शारदे
ठेवि तव हा शिरीं ॥१॥

---

२८

राग--बागेश्री. त्रिताल.

धरिला कसा हरिसी अबोला
सुकली करीं नव पुष्प-माला ॥

हंसुनी धरी करिं वेणु कान्हा
फिरवी परी वदनांबुजाला ॥१॥
धरिला कसा हरिसी अबोला.

---

२९

राग:-भैरवी. दादरा.

( चाल—शाममोहन प्यारे तुम. )

मंगलमय गानीं तव
मोदभरें रमला जिव ॥

दूर सरे कृष्ण निशा
गमत हंसे धवल उषा
भ्रमर न कारि गुंजारव ॥१॥

